**राज्य वेतन सुधारणा समिती - २०१७ नियुक्त केलेली असल्याने ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेतील सुधारणांसंबंधीचे / श्रेणीवाढीचे प्रस्ताव सादर न करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- वेपूर-१२१७/प्र.क्र.१७ /सेवा-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑगस्ट, २०१७.

**<u>प रि प त्र क</u>**

राज्य शासनाने ६ व्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात शिफारशी करण्याकरिता राज्य वेतन सुधारणा समिती-२००८ नियुक्ती केली होती. सदर समितीच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर राज्य शासनाने दि.२२ एप्रिल, २००९ रोजीच्या अधिसूचनेन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना दि.१ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनसंरचना लागू केली आहे. या वेतनसंरचनेत काही त्रुटी असण्याची शक्यता गृहीत धरुन शासनाने २००९ मध्ये वेतनत्रुटी निवारण समिती नियुक्ती केली होती. वेतनत्रुटी निवारण समितीच्या शिफारशींनुसार शासनाने दि.११ फेब्रुवारी, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेतील त्रुटी दूर केल्या आहेत.

२. राज्य वेतन सुधारणा समिती-२००८ तसेच वेतनत्रुटी निवारण समितीसमोर शासकीय कर्मचारी व इतर कर्मचाऱ्यांना व्यक्तीश: अथवा त्यांच्या प्रातिनिधीक संघटनांमार्फत निवेदने सादर करण्याची संधी देऊन मुलाखतीस पाचारण करण्यात आले होते. त्याचप्रमाणे सर्व प्रशासकीय विभागांनाही आपली बाजू मांडण्यासाठी पूर्ण वाव देण्यात आला होता, असे असूनही शासकीय कर्मचारी व इतर कर्मचाऱ्यांच्या संघटनांकडून, तसेच प्रशासकीय विभागांकडून पदांच्या वेतनसंरचना सुधारणेबाबतचे प्रस्ताव अजूनही प्राप्त होत आहेत. वस्तुत: वर विशद केलेल्या परिस्थितीत अशा प्रस्तावांचा स्वतंत्रपणे विचार करण्याचे कोणतेही प्रयोजन शिल्लक राहत नाही. तसेच, आता राज्य शासकीय कर्मचारी आणि इतर पात्र कर्मचाऱ्यांना केंद्र शासनाच्या ७ व्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याकरिता शिफारशी करण्यासाठी राज्य वेतन सुधारणा समिती-२०१७ नेमलेली आहे.

केंद्रीय ६ व्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने राज्य शासकीय व इतर कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनसंरचना लागू केल्यानंतर त्यामधील त्रुटी दूर करण्यास संबंधितांना पुरेसा वेळ व संधी देण्यात आलेली आहे. तसेच राज्य शासकीय कर्मचारी आणि इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या वेतन सुधारणेकरिता राज्य वेतन सुधारणा समिती-२०१७ नेमलेली आहे. तसेच एखाद्या विभागातील संवर्गांच्या ६ व्या वेतन आयोगातील सुधारित वेतनसंरचनेत त्रुटी राहिली असल्यास सदर त्रुटींचे परिक्षण करुन सुधारित वेतनश्रेणीची शिफारस करण्याची बाबदेखील सदर समितीच्या कार्यकक्षेत अंतर्भूत केली आहे. तसेच सदर समितीचे कामकाज सुरु झाले आहे.

वरील पार्श्वभूमीवर शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, न्यायालयाने ज्यावर अंतिम निकाल दिलेला आहे अशी प्रकरणे वगळता यापुढे ६व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेमधील त्रुटीसंबंधीचे कोणतेही प्रस्ताव / संदर्भ विचारार्थ घेऊ नयेत. तसेच इतर कोणत्याही प्रकरणी पदाच्या सध्याच्या वेतनसंरचनेमध्ये व दर्जामध्ये कोणताही बदल करण्यात येऊ नये.

सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी वर नमूद न्यायालयीन प्रकरणे वगळता ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनसंरचनेमधील त्रुटीसंबंधीचे कोणतेही प्रस्ताव / संदर्भ वित्त विभागास सादर करु नयेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०८१४१६३४०७८८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashwant Dattatraya Deshkar

Digitally signed by Yashwant Dattatraya Deshkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a5225b73692fe5cc84da9c6e5a81f64b5ea3b3480f6bc59563e396367311f8, cn=Yashwant Dattatraya Deshkar
Date: 2017.08.14 16:24:01 +05'30'

**( य. द. देशकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई,
४. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
५. सर्व मंत्रालयीन विभाग,
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई -१९
९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.,बॅरॅक क्रमांक १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
१०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी,महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन,एस.व्ही.पटेल रोड,मुंबई-४
११. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई.
१२. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५.